**उपकरणे/सयंत्र खरेदी केल्यानंतर त्याच्या परिरक्षणाकरीता पुरेशी दक्षता घेण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन परिपत्रक क्रमांकः लोलेस-२०१५/प्र.क्र.११४/ वित्त-४

सार्वजनिक बांधकाम भवन, १ ला मजला,
२५, मर्झबान पथ, मुंबई-४०० ००१.
दिनांक : १७ नोव्हेंबर,२०१५

**संदर्भ:- शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III, उद्योग-४, दि. ३०/१०/२०१५**

**प्रस्तावना :-**

भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्या स्थानिक संस्था अहवालातील परिच्छेदासंदर्भात विधानमंडळाच्या लोकलेखा समितीने जिल्हा परिषदांनी अकराव्या केंद्रिय वित्त आयोगाच्या निधीतून खरेदी केलेल्या जलशुध्दीकरण यंत्रांच्या देखभाल दुरुस्तीसाठी आवश्यक असणारा वार्षिक देखभाल दुरुस्ती करार केला नसल्यामुळे सदर संयंत्रे देखभालीअभावी बंद पडली. वार्षिक देखभाल दुरुस्ती करार केल्याशिवाय विद्यार्थ्यांना पिण्यायोग्य व स्वच्छ पाणी देऊ शकत नाही असे निरिक्षण नोंदविलेले आहे. तरी संयंत्र/उपकरणाची खरेदी ही त्याच्या वार्षिक देखभाल व दुरुस्तीच्या खर्चाची तरतूद केल्यानंतरच केली पाहिजे, अशा सूचना दिलेल्या आहेत.

पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणासाठी केंद्र व राज्य शासनाच्या वेगवेगळ्या स्त्रोतातून तसेच स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या स्वनिधीमधून निधी उपलब्ध होत असतो. तसेच केंद्रिय वित्त आयोगांतर्गत ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणासाठीही केंद्र शासनाकडून अनुदान प्राप्त होते. पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणाचे उद्दिष्ट साध्य होण्यासाठी निधीचा योग्यप्रकारे वापर करणे हे सार्वजनिक निधी हाताळणा-या प्रत्येकाचे कर्तव्य आहे. त्याकरीता निधी खर्च करताना वित्तिय औचित्याचे व नियमातील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक आहे. त्यामुळे त्यामधून उपकरणांची खरेदी करताना अथवा योजनेवर खर्च करताना त्याचा पूर्ण व दूरगामी मोबदला सुविधा ज्यांच्यासाठी सुरू केली आहे, त्यांना मिळणे आवश्यक असून तसे उद्दिष्ट ठेऊन योजनेचे नियोजन केले पाहिजे.

तरी विधानमंडळाच्या लोकलेखा समितीची निरिक्षणे व शिफारशी लक्षात घेऊन भविष्यात संयंत्र/उपकरणे खरेदी करताना तसेच खरेदी केलेल्या संयंत्र/उपकरणाच्या परिरक्षणाकरीता सर्व पंचायत राज संस्थांनी पुढीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी अशा सूचना देण्यात येत आहेत :-

**शासन परिपत्रक-**

१. पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणासाठी केंद्र व राज्य शासनाच्या वेगवेगळ्या स्रोतातून तसेच स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या स्व-निधीमधून खरेदी करताना संबंधित उपकरणाचा/उत्पादने/यंत्रसामुग्रीच्या देखभाल, दुरुस्ती, परिरक्षण करणे तसेच त्यासाठी वार्षिक देखभाल करार करणे इ. आवश्यक असून त्याकरीता अनुषंगिक आवर्ती स्वरुपाच्या खर्चासाठी नियोजन करण्याची दक्षता घ्यावी.

२. संयंत्र/उत्पादने/उपकरणाच्या खरेदी बरोबरच खरेदी करण्यात येत असलेल्या संयंत्र/उपकरणे/ उत्पादनांशी संबंधित देखभालीच्या किंवा अन्य सहाय्यकारी सेवांसाठी करार जसे सर्वसमावेशक देखभाल किंवा वार्षिक देखभाल करार (AMC) हा उत्पादनाच्या खरेदी बरोबरच प्राप्त करून घेण्यात यावा किंवा अशा सेवांच्या प्राप्तीसाठी आवश्यक तरतूद करण्यात यावी.

३. उपकरण/यंत्रसामुग्रीच्या परिरक्षणाची जबाबदारी ज्या यंत्रणेने उत्पादने खरेदी केली त्यांची असल्याने खरेदी आदेश नोंदविताना वार्षिक देखभाल करार (AMC) करण्यासाठी संबंधित योजनेतूनच पुरेशा निधीची तरतूद करावी. त्या योजनेतून निधीची तरतूद उपलब्ध शक्य न झाल्यास संबंधित पंचायत राज संस्थेच्या स्व उत्पन्नातून निधीची तरतूद करण्याची उपाययोजना करावी. त्याअनुषंगाने नियंत्रणाची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहिल.

४. निधीचा विनियोग करताना पंचायत राज संस्थामार्फत होणारी कामे/दिल्या जाणाऱ्या सेवा/योजना/कार्यक्रम यांचा दर्जा व गुणवत्ता विहित निकषानुसार राहिल याची दक्षता घ्यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५१११६१६१२५३८८२० असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaibhav R Rajeghatge

Digitally signed by Vaibhav R Rajeghatge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vaibhav R Rajeghatge
Date: 2015.11.30 13:14:50 +05'30'

( वैभव राजेघाटगे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सर्व जिल्हा परिषदांचे मा.अध्यक्ष ,

२. मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य (सर्व), महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ, मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर,
५. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानमंडळ, मुंबई,
७. सर्व विभागीय आयुक्त (महसूल),
८. सर्व सह/उप सचिव, ग्राम विकास विभाग,
९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१०. सर्व महसूल विभागाचे उप आयुक्त (विकास),
११. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव,
१२. मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
१३. संचालक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई.
१४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
१५. सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत).
१६. सहसंचालक, स्थानिक निधी लेखा, (सर्व विभाग).
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८. कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग/ का.क्र.वित्त-८.
१९. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक
२०. निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.